पवाळे लघु पाटबंधारे प्रकल्प, ता. मुरबाड, जि. ठाणे या योजनेस द्वितीय सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग,
शासन निर्णय क्र. खाभूयो -२०२३/प्र. क्र.१२९ /खारभूमी
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ०१ ऑगस्ट, २०२४

**पहावे :-**

१) शासन निर्णय क्र. लपायो/ १०८६(२४९/१९८६)/खारभूमी दि.०८/०६/१९८८
२) शासन निर्णय क्र. लपायो-२००४ (३८६/२००४)/खारभूमी दि.१५ /०२/२००५
३) जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्र. लपायो-२०१३ (२५८/२०१३)/खारभूमी दि.१४ /०६/२०१८
४) कार्यकारी संचालक,कोंकण पाटबंधारे विकास महामंडळ,ठाणे यांचे पत्र जा.क्र.कोंपाविम/तां-६/ पवाळे / द्वितीय सुप्रमा /२३१३ /२०२३ दि. ०६/०७/२०२३
५) वित्त विभाग पत्र क्र.व्यअस-२०२४ /प्र.क्र. ६१/अर्थ -२, मंत्रालय, मुंबई दि.११.०७.२०२४

**प्रस्तावना:-**

पवाळे लघु पाटबंधारे प्रकल्प, ता. मुरबाड, जि. ठाणे हा मौजे पवाळे गावापासुन १.५ कि मी. अंतरावरील उल्हास नदी खोऱ्यातील काळू नदीस मिळणाऱ्या स्थानिक नाल्यावर मातीचे धरण बांधण्यात येत आहे. सदर प्रकल्प कोकण पाटबंधारे विकास महामंडळ अंतर्गत "उर्वरीत महाराष्ट्र" या प्रदेशांतर्गत आहे. धरणाची एकूण साठवण क्षमता ३.१६७ द.ल.घ.मी. व उपयुक्त पाणीसाठा ३.१२३ द.ल.घ.मी. इतका आहे. या प्रकल्पामुळे मुरबाड तालुक्यातील पवाळे ४५ हेक्टर, पिंपळगाव ३५ हेक्टर व भालुक १७२ हेक्टर असे तीन गावांमधील एकूण २५२ हेक्टर क्षेत्रास सिंचनाचा लाभ मिळणार आहे. या शिवाय पिण्यासाठी ०.०६३ द.ल.घ.मी. पाणी वापर प्रस्तावित आहे.

सदर योजनेस संदर्भाधिन क्र.१ येथील दि.०८/०६/१९८८ च्या शासन निर्णयान्वये रु. १३७.०० लक्ष रक्कमेस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. सदरची प्रशासकीय मान्यता व्यपगत झाल्याने संदर्भाधिन क्र. २ येथील दि.१५/०२/२००५ च्या शासन निर्णयान्वये दरसूची सन २००३-०४ नुसार रु. ८८२.७५ लक्ष रक्कमेस पुनः प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. तदनंतर संदर्भाधिन क्र. ३ येथील दि.१४/०६/२०१८ च्या शासन निर्णयान्वये दरसूची सन २०१०-११ नुसार रु. २०९०.०० लक्ष रक्कमेस प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. सदर प्रकल्पाच्या सन २०२१-२०२२ च्या दरसुचीवर आधारीत रु.३६५५.२० लक्ष किंमतीच्या द्वितीय सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रस्तावाबाबत, राज्य तांत्रिक सल्लागार समिती-२ (SLTAC-II) च्या दि. ०७/०२/२०२३ रोजी झालेल्या ७५ व्या बैठकीत छाननी अहवालातील १ ते २७ मुद्दे विचारात घेण्याच्या अधीन राहून, समितीकडून शिफारस करण्यात आली आहे. संदर्भ क्र.४ अन्वये कार्यकारी संचालक, कोंकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे, यांच्याकडून पवाळे लघु पाटबंधारे प्रकल्प, ता. मुरबाड, जि. ठाणे या प्रकल्पाचा द्वितीय सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रस्ताव शासनास प्राप्त झाला होता. त्यास अनुसरून शासन पुढील आदेश निर्गमित करीत आहे.

**शासन निर्णय :-**

पवाळे लघु पाटबंधारे प्रकल्प, ता.मुरबाड जि.ठाणे या प्रकल्पास जलसंपदा विभाग दरसूची सन २०२१-२०२२ व सार्वजनिक बांधकाम विभाग दरसूची सन २०२१-२०२२ वर आधारित रु. ३६५५.२० लक्ष ( अक्षरी रुपये तीन हजार सहाशे पंच्चावन्न लक्ष वीस हजार फक्त ) किंमतीस [ प्रत्यक्ष कामासाठी रु. ३४२१.७४ लक्ष व

अनुषंगिक खर्च रु. २३३.४६ लक्ष] खालील अटींच्या अधीन राहून द्वितीय सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. प्रकल्पाचा उपशिर्षनिहाय तरतूदींचा गोषवारा परिशिष्ट - "अ" मध्ये सोबत जोडला आहे.

१) " पवाळे लघु पाटबंधारे प्रकल्प, ता.मुरबाड जि.ठाणे " या प्रकल्पाचा द्वितीय सुधारीत प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेतच काम पूर्ण करण्याची दक्षता घ्यावी. तसेच प्रकल्प नियोजित वेळेत पूर्ण करावा.

२) " पवाळे लघु पाटबंधारे प्रकल्प, ता.मुरबाड जि.ठाणे या प्रकल्पाच्या द्वितीय सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रस्तावामध्ये अंतर्भुत किंमतीस तांत्रिक मान्यता प्राप्त करुन घ्यावी.

३) सर्व तांत्रिक मान्यता सक्षम स्तरावर घेण्याची कार्यवाही महामंडळाने करावी. तसेच राज्य तांत्रिक सल्लागार समितीने परिच्छेद २७ मधील अ.क्र.५ मधील (i) ते (iv) बाबत उपस्थित मुद्द्यांची पूर्तता करूनच पुढील कार्यवाही करणे आवश्यक राहील.

४) “पवाळे लघु पाटबंधारे प्रकल्प, ता.मुरबाड जि.ठाणे ”या प्रकल्पाची द्वितीय सुधारीत प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रीक बाबी, निविदाविषयक क्षेत्रिय निर्णय किंवा अनियमितता यास मान्यता गृहीत धरली जाणार नाही. अशा प्रकरणाची तपासणी त्यावेळच्या प्रचलित शासन नियमानुसार करण्याची जबाबदारी संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभागाची राहील.

५) सदर प्रकल्पासाठी कोणत्याही प्रयोजनार्थ मंजूर द्वितीय सुधारीत प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन, निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च न करण्याची जबाबदारी संपूर्णपणे महामंडळाची राहील.

६) सदर प्रकल्पाची अंमलबजावणी करताना प्रचलीत शासन निर्णय, नियम, CVC तत्वे, वित्तीय मर्यादा, विहित निविदा कार्यपध्दती अनुसरणे, आवश्यकतेनुसार राज्य तांत्रिक सल्लागार समितीने प्रकल्पाच्या व कामाच्या अनुषंगाने दिलेल्या निदेशांचे व त्रुटींची पूर्तता करणे याची सर्वस्वी जबाबदारी महामंडळाची राहील.

या प्रकल्पाचा कामावरील खर्च मागणी मुख्य लेखाशीर्ष "४७०२ लहान पाटबंधारे यावरील भांडवली खर्च, ८००-इतर खर्च (१), सर्वसाधारण लघु पाटबंधारे योजना (१) " या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि तो मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या (कार्यासन १४३४) अनौपचारिक संदर्भ क्र. १३६/२४ दिनांक १५.०३.२०२४ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१८९/२०२४/व्यय-१२ दिनांक १५.०४.२०२४ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार तसेच दिनांक ०३ जुलै २०२४ रोजी झालेल्या व्यय अग्रक्रम समितीच्या बैठकीमध्ये झालेल्या निर्णयाच्या अनुषंगाने संदर्भाधिन क्र.५ अन्वये प्राप्त इतिवृतानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

या प्रकल्पास प्रदान करण्यात आलेली द्वितीय सुधारीत प्रशासकीय मान्यता खारभूमी कार्यासनाच्या सुधारीत प्रशासकीय मान्यता नोंदवहीत २१ या अनुक्रमांकावर नोंदविण्यात आली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०८०११४४९२३३२२७ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAVIN SHIVAJI KOLHE

Digitally signed by PRAVIN SHIVAJI KOLHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=d3179b092692e5a493ad13c482974ccf422b154ad3219b12b5a56d8ec2ed058e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A5CAFEFCF97B7EE559404B1081AE6CC80B0710E3FC3826245F60E43248C12F10, cn=PRAVIN SHIVAJI KOLHE
Date: 2024.08.01 15:05:00 +05'30'

**( प्रविण कोल्हे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**सहपत्र :- परिशिष्ट "अ"**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, यांचे सचिव मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, यांचे प्रधान सचिव मुंबई.
३. मा. उप मुख्यमंत्री, (जलसंपदा) महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, यांचे प्रधान सचिव मुंबई.
४. मा. उप मुख्यमंत्री, (वित्त व नियोजन ) महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, यांचे प्रधान सचिव मुंबई.

५. सर्व मा. मंत्री / मा. राज्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
६. मा. विरोधी पक्ष नेते, विधानपरिषद/विधानसभा महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य,१/२ मुंबई / नागपूर.
८. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य,१/२ मुंबई / नागपूर.
९. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.
१०. नियोजन विभाग (कार्यासन १४३४), मंत्रालय, मुंबई -३२.
११. जिल्हाधिकारी, ठाणे.
१२. कार्यकारी संचालक, कोंकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे.
१३. महासंचालक, संकल्पन, प्रशिक्षण, जलविज्ञान, संशोधन व सुरक्षितता, मेरी नाशिक.
१४. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोंकण प्रदेश, मुंबई.
१५. आंतर वित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१६. उप सचिव (निवसं), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.
१७. उप सचिव (लपा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.
१८. अधीक्षक अभियंता, उत्तर कोंकण पाटबंधारे प्रकल्प मंडळ, कळवा - ठाणे.
१९. अवर सचिव (खारभूमी), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.
२०. अर्थ शाखा - १ व २, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.१८
२१. खारभूमी कार्यासन (संग्रहार्थ).

**परिशिष्ट - अ**

(शासन निर्णय जलसंपदा विभाग क्र. खाभूयो -२०२३/प्र.क्र.१२९/खारभूमी, दिनांक: ०१ ऑगस्ट, २०२४ चे परिशिष्ट)

**पवाळे लघु पाटबंधारे प्रकल्प, ता.मुरबाड जि. ठाणे द्वितीय सुधारीत प्रशासकीय मान्यता उपशिर्षनिहाय तरतूदी**

| अ.क्र. | उपशिर्ष | द्वितीय सुप्रमा नुसार तरतुद ( जलसंपदा विभाग दरसूची सन २०२१-२२ व सा.बां.विभाग दरसूची सन २०२१-२२) रू. लक्ष |
|---|---|---|
| **अ) शीर्षकामे :** | | |
| १ | ए - प्राथमिक | १.३० |
| २ | बी - भूसंपादन | ९१३.४२ |
| ३ | सी - मुख्यकामे | १७४०.६१ |
| ४ | डी - विमोचक | १९९.५७ |
| ५ | के - इमारती | ६.११ |
| ६ | एम - वृक्षारोपण | ०.८० |
| ७ | ओ - संकीर्ण | ३.३२ |
| ८ | पी - देखभाल | १९.४७ |
| ९ | आर - रस्ते | ०.५० |
| | **एकूण शीर्षकामे (अ)** | **२८८५.१०** |
| **ब) कालवे व वितरण व्यवस्था :** | | |
| १ | ए - प्राथमिक | ०.०० |
| २ | बी - भूसंपादन | १७३.६९ |
| ३ | डी - विमोचक | ०.०० |
| ४ | ई - प्रपात | ०.०० |
| ५ | एफ- मोरीकामे | ०.०० |
| ६ | एच- एस्केप | ०.०० |
| ७ | एल- मातीकाम | ०.०० |
| ८ | ओ - संकीर्ण | ३.०० |
| ९ | पी - देखभाल | ३.५६ |
| १० | आर - दळणवळण | ०.०० |
| | **एकूण कालवा** | **१८०.२५** |
| ११ | III- वितरीका (PDN) | **३५६.३९** |
| | **एकूण (ब)** | **५३६.६४** |
| १२ | **आस्थापना, व इतर अनुषंगिक कामे (क)** | **२३३.४६** |
| | **एकूण किंमत (अ+ब+क)** | **३६५५.२०** |

PRAVIN SHIVAJI KOLHE

Digitally signed by PRAVIN SHIVAJI KOLHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=d3179b092692e5a493ad13c482974ccf422b154ad3219b12b5a56d8ec2ed058e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A5CAFEFCF97B7EE559404B1081AE6CC80B0710E3FC3826245F60E43248C12F10, cn=PRAVIN SHIVAJI KOLHE
Date: 2024.08.01 15:05:31 +05'30'

**(प्रविण कोल्हे)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रकल्पाची ठळक वैशिष्टे :-**

| | | |
|---|---|---|
| १ | पवाळे ल.पा.प्रकल्पाचे सिंचन क्षेत्र | २५२ हेक्टर ( ICA) |
| २ | प्रकल्पाचा एकूण पाणीसाठा | ३.१६७ द.ल.घ.मी. |
| ३ | लाभव्यय गुणोत्तर | १.५४ (मापदंड १ पेक्षा अधिक) प्रकल्प मापदंडात बसतो. |
| ४ | आर्थिक परतावा दर | १३.११ % ( मापदंड १२ % पेक्षा अधिक) प्रकल्प मापदंडात बसतो. |
| ५ | पाणीसाठा किंमत | रू. १,१५,४१५/- प्रती सघमी ( प्रचलित मापदंड रू १,७६,७२० /- प्रती सघमी पेक्षा कमी ) प्रकल्प मापदंडात बसतो. |

PRAVIN SHIVAJI KOLHE

Digitally signed by PRAVIN SHIVAJI KOLHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=d3179b092692e5a493ad13c482974ccf422b154ad3219b12b5a56d8ec2ed058e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A5CAFEFCF97B7EE559404B1081AE6CC80B0710E3FC3826245F60E43248C12F10, cn=PRAVIN SHIVAJI KOLHE
Date: 2024.08.01 15:05:46 +05'30'

**(प्रविण कोल्हे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**